कृषि विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांकरिता सुधारीत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या अंमलबजावणीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. साविव्य-२०२१/प्र.क्र.४२/२-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक : १७ मे, २०२२.

संदर्भ :-

१. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र. साविव्य-२०२१/ प्र.क्र.४२/ २अे दि. ०२.०८.२०२१

२. संचालक, व्यय विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. F.No.१(१३)/ PFMS/ FCD/ २०२० दि. १६.०३.२०२२

३. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. जाक्र.कृआ/ ससं(लेखा-१)/ एसएनए/ १९२ आर/ २०२२ दि. ११.०४.२०२०

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ १ च्या शासन निर्णयान्वये कृषि विभागाच्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याकरिता समन्वय अधिकारी, एकमेव समन्वय यंत्रणा व अंमलबजावणी यंत्रणा यांची नियुक्ती केली आहे. सदर प्रणालीद्वारे केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांचा निधी उपलब्ध करुन देण्यासाठी कृषि आयुक्तालय स्तरावर भारतीय स्टेट बँकेमधील चालू खात्यांचे बचत खात्यांत रुपांतरण करून सदर खाते संबंधित योजनेसाठी एकमेव समन्वय खाते (Single Nodal Account) म्हणून उपयोगात आणावे त्याचप्रमाणे, विभागीय कृषि सहसंचालक स्तरावरील व जिल्हा स्तरावरील भारतीय स्टेट बँकेमधील चालू खात्यांचे रुपांतरण शून्य शिल्लक उप खात्यांत (zero balance subsidiary accounts) करुन सदरची सर्व बँक खाती आयुक्तालय स्तरावरील एकमेव समन्वय खात्याला जोडून घेण्याची कार्यवाही करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या होत्या.

उपरोक्त शासन निर्णयाप्रमाणे चालू खात्यांचे बचत खात्यांत रुपांतरित करण्यास तांत्रिक अडचणींमुळे भारतीय स्टेट बँकेने असमर्थता दर्शविल्यामुळे कृषि आयुक्तालय व जिल्हा स्तरावर नवीन बँक खाती उघडण्यात आली असल्याने या नव्याने उघडण्यात आलेल्या बचत व शून्य शिल्लक उपखात्यांना मान्यता देणे व केंद्राच्या निर्देशाप्रमाणे अधिकारी/कर्मचारी तसेच संस्था (Vendor) यांचे Income Tax, GPF, PT, GST, TDS इ. च्या कपातींसाठी नवीन Holding Account उघडण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे शासननिर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सुधारित सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या अंमलबजावणीसाठी कृषि आयुक्तालय स्तरावर केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांकरिता योजनानिहाय भारतीय स्टेट बँकेमध्ये नव्याने उघडण्यात आलेल्या बचत खात्यांस संबंधित योजनेसाठी एकमेव समन्वय खाते (Single Nodal Account) व जिल्हा स्तरावर भारतीय स्टेट बँकेमध्ये नव्याने उघडण्यात आलेल्या खाते शून्य शिल्लक उपखाते (zero

balance subsidiary accounts) म्हणून वापरण्यास या शासन निर्णयाव्दारे कार्योत्तर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या निर्देशांप्रमाणे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या माध्यमातून अदायगी करताना विविध कपातींचे व्यवहार सुलभ होण्यासाठी कृषि विभागाच्या सर्व केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांसाठी कृषि आयुक्तालय व जिल्हा स्तरावर भारतीय स्टेट बँकेमध्ये एक Holding Account उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर Holding Account मधून सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या बाहेर चेक अथवा इंटरनेट बँकींगच्या द्वारे चलनाची माहिती प्राप्त करुन वैधानिक अदायगी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर Holding Account हे राज्य शासन व स्थानिक स्वराज्य संस्थांचे कर/शुल्क/अतिरिक्त कर/स्थानिक स्वराज्य संस्थांचे चार्जेसच्या व्यवहारासाठी वापरण्यात यावे.

५. सदर Holding Account मध्ये अधिकतम चौदा दिवसांसाठी निधी राहील व त्यानंतर सदर निधी संबंधित यंत्रणेच्या खात्यांत जमा होईल याचा दक्षता घ्यावी

६. उपरोक्त शासननिर्णयान्वये सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या समन्वयासाठी मंत्रालय स्तरावर संबंधित योजनेच्या सहसचिव /उपसचिव यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती केली होती, तथापि, सदर प्रणालीच्या सुलभ वापरासाठी विभागस्तरावर एकच समन्वय अधिकारी आवश्यक असल्याने सहसचिव/उपसचिव (अर्थसंकल्प) यांची समन्वय अधिकारी नियुक्ती करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०५१७१२३३४४९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.05.17 14:56:21 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, मराफऔवमं, पुणे.
३. मुख्य महाप्रबंधक, भारतीय स्टेट बँक, महाराष्ट्र सर्कल, वांद्रे कुर्ला संकुल, मुंबई.
४. कृषि सहसंचालक (सर्व).
५. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
६. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ ( लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१५/ कोषा प्रशा-४), मंत्रालय, मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई.
११. सह सचिव /उप सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२. निवड नस्ती कार्यासन २अे.